सन २०१८-१९ या वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पित तरतुद वितरीत करण्याबाबत...
सहायक अनुदान

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-एमसीओ-२०१७/प्र.क्र.३५८/नवि-१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६ ऑक्टोबर, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.१९१/नवि-१४, दि.१६.०६.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.-अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
३) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.३५८/नवि-१४, दि.१६.०४.२०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नगरपरिषदांचा जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे त्याऐवजी सदर नगरपरिषदांना सहायक अनुदान वितरीत करण्यात येते. सदर प्रयोजनार्थ सन २०१८-१९ करीता रक्कम रू.१४९१.०० कोटी वित्त विभागाने अर्थसंकल्पित केलेले आहेत. त्यापैकी ७०% निधी रु. १०४३.७० कोटी संदर्भिय दि.१६.०४.२०१८ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता, उर्वरित ३०% निधी रू.४४७.३० कोटी वितरणाकरीता वित्त विभागाने अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करून दिलेला आहे. त्यापैकी, अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध झालेला रु.४४१.२४२५ कोटी इतका निधी वितरणाकरीता उपलब्ध झालेला आहे.

सन २०१८-१९ मधील वरीलप्रमाणे प्राप्त अनुदान, शासन परिपत्रक, वित्त विभाग दि०२.०४.२०१८ मध्ये विहित केलेल्या अटींची पुर्तता झाल्यावरच संबंधित नगरपरिषद/ नगरपंचायती/ महानगरपालिकांना वितरीत करण्यात यावे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नगरपरिषदांचा जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे त्याऐवजी सदर नगरपरिषदांना सहायक अनुदान देण्यात येते. सन २०१८-१९ करीता राज्यातील नगर परिषदांसाठी सहायक अनुदानाकरीता वितरण प्रणालीद्वारे प्राप्त झालेले उर्वरित ३०% रू.४४७.३० कोटी पैकी रु.४४१.२४२५ कोटी सहायक अनुदान संबंधित नगरपरिषद/ नगरपंचायत/ महानगरपालिका यांना वितरीत करण्याकरीता नगरपरिषद प्रशासन संचालनालयास वितरीत करण्यात येत आहे.

२. नगरपालिकांना वितरीत होणारे सहायक अनुदान नगरपरिषद प्रशासन संचालनालयाकडून थेट नगरपरिषदा / नगरपंचायतींच्या बँक खात्यात जमा करण्याकरिता आयुक्त तथा संचालक यांना नियंत्रण अधिकारी व सहायक संचालक यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

३. सदरचा निधी वितरीत करतांना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि. ०२.०४.२०१८ मधील अटींची पुर्तता केल्यावरच तसेच ७५% उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यावरच सदर निधी संबंधित नगर परिषदांना वितरीत करण्यात यावा.

४. सदरचा निधी मागणी क्रमांक- एफ-२, २२१७, नगरविकास, १९२, नगरपरिषदांना सहाय, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (६०) जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना द्यावयाचे सहायक अनुदान, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)(२२१७ ८०६६) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

५. महालेखापाल यांच्या संकेतस्थळावरील विवरणपत्रानुसार प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रांचा आहरण व संवितरण निहाय निपटारा एक महिन्यात करण्यात यावा. सदरची प्रमाणपत्रे अधिदान कार्यालयास सादर न करता ती महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

६. वित्त विभागाच्या संकेतस्थळावरील विवरणपत्रानुसार प्रलंबित संक्षिप्त देयकांचा निपटारा एक महिन्यात करण्यात यावा.

७. नगर परिषद प्रशासन संचालनालयाने अतिप्रदान झालेल्या रकमांची संबधित नगरपरिषदांकडून त्वरेने वसूली करावी. तसेच सदरची वसुली ९११, अतिप्रदानाची वसुली, (००) (०२) अतिप्रदानाची वसूली (योजनेतर) (२२१७९९५७) ७०, वजा वसुली या लेखाशिर्षाखाली करण्यात यावी.

८. सदरील शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थस-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ अन्वये दिलेल्या अधिकारीतेत निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१५४५४५३०२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Sanjay S Gokhale

Digitally signed by Sanjay S Gokhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab8a7eeedad158d24cf530f0d6b662808245be49a8459ed4c63961ebdc3cb961, cn=Sanjay S Gokhale
Date: 2018.10.16 15:49:36 +05'30'

**(सं.श.गोखले)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त,
३. सर्व जिल्हाधिकारी.
४. सर्व मुख्याधिकारी.
५. महालेखापाल (ले व अ) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०. कार्यासन व्यय-३/अर्थसंकल्प-१६/कोषा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन नवि-४/ कार्यासन नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (नवि-१४).